**सन २०१४-१५ च्या टंचाई कालावधीसाठी पाणी टंचाई निवारणार्थ शेंद्रा एम. आय. डी. सी.औरंगाबाद येथून टँकरद्वारे पाणी पुरवठा करण्यासाठी हायड्रन्टची उभारणी करणे या उपाययोजनेस प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०१५/प्र.क्र. १११ /पापु १४**
जी. टी. रुग्णालय संकुल, ७ वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीखः ४ सप्टेंबर, २०१५

**वाचा -**

१) शासन निर्णय पा.पु. व स्व. वि. क्रमांकः टंचाई १०९९/प्र.क्र. १२/पापु १४, दिनांक ३.२.१९९९
२) शासन पत्र क्रमांक टंचाई २०१४/प्र.क्र. ८४/पापु १४, दिनांक २८.८.२०१५ (बैठकीचे इतिवृत्त)
३) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे क्रमांक २०१४/मशाका-१/पाटं/नैआ/प्र.क्र., दिनांक २८.०५.२०१५ चे पत्र व प्रस्ताव
४) जिल्हाधिकारी, जालना यांच्या क्रमांक जा.क्र. २०१५/मशाका/पाटं/कावि/५५२, दिनांक १६.५.२०१५ चे पत्र व प्रस्ताव

**प्रस्तावना -**

विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी सन २०१४-१५ च्या टंचाई कालावधीसाठी पाणी टंचाई निवारणार्थ शेंद्रा एम. आय. डी. सी., औरंगाबाद येथून टँकरद्वारे पाणी पुरवठा करण्यासाठी हायड्रन्टची उभारणी करणे या उपाययोजनेस मान्यता मिळणेबाबत रु. ६१,५३६/- इतक्या किंमतीचा प्रस्ताव शासनास सादर केला होता. सदर प्रस्ताव सचिव स्तरीय स्थायी समितीच्या दिनांक २४.८.२०१५ रोजी झालेल्या बैठकीत मान्यतेसाठी विचारात घेण्यात आला.

सदर प्रस्तावावर दि. २४.८.२०१५ रोजीच्या स्थायी समितीच्या बैठकीत चर्चा होऊन स्थायी समितीने प्रस्तावास मंजूरी दिली. त्या अनुषंगाने सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी सन २०१४-१५ च्या टंचाई कालावधीसाठी पाणी टंचाई निवारणार्थ शेंद्रा एम. आय. डी. सी., औरंगाबाद येथून टँकरद्वारे पाणी पुरवठा करण्यासाठी हायड्रन्टची उभारणी करणे या उपाययोजनेस प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत प्रस्ताव संदर्भ क्र. ३ च्या पत्रासोबत शासनास सादर केलेला आहे. सदर प्रस्तावात नमूद केलेल्या कामांचा समावेश असलेल्या रु. ६१,५३६/- (रुपये एकसष्ट हजार पाचशे छत्तीस फक्त) किंमतीच्या प्रस्तावास स्थायी समितीने दिनांक २४.८.२०१५ च्या बैठकीत मान्यता दिलेली आहे. त्या अनुषंगाने आता सदर प्रस्तावास खालील अटींच्या अधिन राहून या आदेशान्वये प्रशासकिय मान्यता देण्यात येत आहे :-

१) जिल्हाधिकारी, जालना यांनी जिल्ह्यात पिण्याच्या पाण्याची टंचाई निर्माण झाली असल्याचे सर्व प्रथम घोषित करणे.
२) या हायड्रन्ट उभारणीसाठी घेण्यात आलेली यंत्रसामुग्री तसेच पाईप्स यांचा वापर संपल्यानंतर पुढील वर्षीच्या वापराकरिता सुरक्षित जतन करण्याची जबाबदारी संबंधित पंचायत समितीवर सोपविण्यात यावी.
३) सदर हायड्रन्ट उभारणीचे काम तातडीने पूर्ण करावे.
४) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी सदर उपाययोजनेकरिता सुरुवातीस ५०% इतका निधी द्यावा. उर्वरित ५०% निधी उपाययोजना कार्यान्वित झाल्यानंतर देण्यात यावा.

२. याबाबत होणारा खर्च मागणी क्र. सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०१- अवर्षण, १०२ पिण्याच्या पाण्याचा पुरवठा, ९१ - राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१)(०१) पिण्याच्या पाण्याच्या आकस्मिक निकडीच्या पुरवठा (२२४५००९३) (दत्तमत) (वेतनेत्तर) - ३१, सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखालील तरतूदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ नागरी व ग्रामीण क्षेत्रातील विहित आर्थिक व भौतिक निकषाबाहेरील तात्पुरत्या पाणी पुरवठा योजना / उपाययोजनांना प्रशासकीय मंजूरी देण्यासाठी सचिवस्तरीय स्थायी समिती स्थापन केली असून सदर समितीच्या दिनांक २४.८.२०१५ रोजी झालेल्या बैठकीत झालेल्या निर्णयास अनुलक्षूण निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९०४१७१२२६९६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Bhaskar Kumatgi

Digitally signed by Rajendra Bhaskar Kumatgi
DN: CN = Rajendra Bhaskar Kumatgi, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section Officer
Date: 2015.09.05 12:45:57 +05'30'

**(राजेंद्र कुमटगी)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा व परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
२. महालेखापाल, (लेखा व परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर
३. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सचिव (म.व पु.), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
७. विभागीय आयुक्त, औरंगाबाद
८. जिल्हाधिकारी, जालना
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना
१०. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, जालना
११. मा.प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
१२. उप सचिव (पापु १४) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
१३. पापु १४ (निवडनस्ती)